श्री. चंद्रकांत आ. निनाळे, सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या विनंती बदलीबाबत तसेच त्यांच्याकडे छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेतील वरिष्ठ प्रकल्प संचालक (कौशल्य विकास) या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग,**
**शासन आदेश क्र. बदली-२०२१/प्र.क्र. १८६/व्यशि-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २१ जानेवारी, २०२२

**शासन आदेश:**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्याचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व ४ (५) मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या लगतनंतरच्या वरिष्ठ प्राधिकाऱ्यांच्या पूर्व मान्यतेने खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्याची विनंतीवरुन बदलीने त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक-४ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे कार्यालय | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री. चंद्रकांत आत्माराम निनाळे, सह संचालक | व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, पुणे. | विनंतीनुसार रिक्त पदावर |

२. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्याला त्यांच्या बदलीच्या ठिकाणी त्वरीत कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना बदलीच्या ठिकाणी ताबडतोब रुजू होण्यास सांगावे. तसेच बदली झालेल्या अधिकाऱ्यास रजा मंजूर करु नये.

३. सदरहू अधिकाऱ्याची विनंती बदली असल्या कारणाने प्रचलित नियमानुसार पदग्रहण अवधी व प्रवासभत्ता अनुज्ञेय असणार नाही.

४. तसेच या आदेशान्वये करण्यात आलेली बदली रद्द करणे किंवा त्यात बदल करणे यासाठी राजकीय दडपण/दबाव आणल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित सह संचालक यांच्याविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ अनुसार शिस्तभंगाची कारवाई सुरु करण्यात येईल.

५. तसेच श्री.चंद्रकांत आत्माराम निनाळे, सह संचालक यांच्याकडे स्वत:च्या पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या सांभाळून छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेतील वरिष्ठ प्रकल्प संचालक (कौशल्य विकास) या पदाचा अतिरिक्त कार्यभार पुढील आदेशापर्यंत सोपविण्यात येत आहे.

६. संबंधित सह संचालक यांनी नियुक्तीच्या नवीन ठिकाणी तात्काळ रुजू होऊन तसा अनुपालन अहवाल संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१२११२५२०८६८०३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT AND ENTREPRENEURSHIP DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=be7f8a656a063523ecdbac5e75130d8b7a4674a77a2691e4bf21582d392883e9, pseudonym=323361D01E3FB518718EE3AAAE55DB3EC668FBE8, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2022.01.21 12:53:34 +05'30'

**( प्रदीप सा. शिवतरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे.
२. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/निवासी लेखाधिकारी, मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, जि.पुणे.
६. श्री.चंद्रकांत आ.निनाळे, सह सचांलक (संचालकांमार्फत)
७. सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर.

**प्रत:**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (कौशल्य विकास, रोजगार ) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई ४०००३२.
५. मा. राज्यमंत्री (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
७. प्रधान सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
८. उपसचिव/सह सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
९. निवडनस्ती (व्यशि-१)